"क" वर्ग ग्रामीण तीर्थक्षेत्रांच्या विकास कामाकरीता
उपलब्ध करण्यात येणा-या उर्वरित निधीच्या वितरणाबाबत

महाराष्ट्र शासन
ग्राम विकास व जलसंधारण विभाग
शासन परिपत्रक क्र.तीर्थवि-२०१०/प्र.क्र.१८३/योजना-७
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक:- १२ ऑगस्ट २०१०

# परिपत्रक

सन २००९-१० या आर्थिक वर्षात व तत्पूर्वी "क" वर्ग ग्रामीण तीर्थक्षेत्र विकास कार्यक्रमांतर्गत तीर्थक्षेत्रांच्या ठिकाणी विविध विकास कामांकरीता राज्यस्तरावरुन शासनाने निधी वितरीत केलेला आहे. काही ग्रामीण तीर्थक्षेत्रांसाठी निधी अभावी एकूण अंदाजपत्रकीय रकमेपेक्षा किंवा प्रशासकीय मान्यता दिलेल्या रकमेपेक्षा कमी निधीचे वितरण करण्यात आलेले आहे. तरी आता उर्वरित निधीच्या वितरणाबाबत खालीलप्रमाणे सूचना देण्यात येत आहेत.

शासनस्तरावरुन सन २००९-१० या आर्थिक वर्षात किंवा तत्पूर्वी ज्या "क" वर्ग ग्रामीण तीर्थक्षेत्रांच्या विकास कामांसाठी अंदाजपत्रकीय किंमतीपेक्षा किंवा प्रशासकीय मान्यता दिलेल्या रकमेपेक्षा कमी निधी वितरीत केला असेल अशा तीर्थक्षेत्रांसाठी, मंजूर कामांची अंदाजपत्रकीय रक्कम व प्रशासकीय मान्यतेची रक्कम यापैकी जी रक्कम कमी असेल ती विचारात घेऊन त्याच कामांसाठी उर्वरित निधीचे वितरण जिल्हा नियोजन समितीमार्फत त्यांच्या स्तरावरील निधीतून प्राधान्याने करण्यासाठी जिल्हा नियोजन समितीकडे प्रस्ताव पाठविण्यात यावा व जिल्हा स्तरावरील निधीतून उर्वरीत निधी उपलब्ध करुन घ्यावा.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाची वेबसाईट www.maharashtra.gov.in वर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक सांकेतांक २०१००८१२१७१७३३००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने,

( सु.ए.आंधळे )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत
१) विभागीय आयुक्त (सर्व), विभागीय आयुक्त कार्यालय.
२) जिल्हाधिकारी (सर्व), जिल्हाधिकारी कार्यालय.
३) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
४) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१ मुंबई/नागपूर
५) महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई/नागपूर
६) मुख्य लेखा व वित्त अधिकारी (सर्व)
७) जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व)
८) नियोजन विभाग (का.१४७४), मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
९) वित्त विभाग (व्यय-१५, अर्थ-१६), मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१०) कार्यासन वित्त-१, वित्त-७, वित्त-८, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई ४०००३२
११) निवडनस्ती, योजना-७, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई ४०००३२